**राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत बोरगाव (ता. कवठेमहंकाळ, जि.सांगली) नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पापुयो-२२१५/प्र.क्र.११/पापु-१७**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २७ मार्च, २०१५

वाचा

१) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११०९/१०४(अ)/पापु-०७ दिनांक १७ मार्च २०१०.
२) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ०९ ऑक्टोबर २०१३
३) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११३/प्र.क्र.१५६/पापु-०७, दिनांक २२ जानेवारी, २०१४
४) ग्रा.पा.पु. योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/२२/पापु-०७, दि. ०९ जुलै,२०१४
५) ग्रा.पा.पु.योजनांच्या मार्गदर्शक सुचनांबाबतचा शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/२२/पापु-०७, दि. ०९ जुलै,२०१४
६) मु. का. अ. जि.प. सांगली यांचे पत्र जा.क्रं.जिपसां/ग्रापापु/तांशा-१/१९१९/२०१४, दि.२० ऑगस्ट,२०१४

**प्रस्तावना:-**

बोरगाव (ता. कवठेमहंकाळ, जि.सांगली) नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन पत्र क्र. ६ अन्वये शासन मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. सदर योजनेस कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सांगली यांनी दि. ०८ ऑगस्ट, २०१४ रोजी तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. ग्रामसभेच्या मागणीनुसार जिल्हा परिषद, सांगली यांनी ४० लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेची नळ पाणी पुरवठा योजना प्रस्तावित केली आहे. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत ४० लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेच्या बोरगाव (ता. कवठेमहंकाळ, जि.सांगली) नळ पाणी पुरवठा योजनेच्या रू. ३,२०२/- इतका दरडोई खर्च असलेल्या रू. १,३२,९०,१७६/- (रूपये एक कोटी बत्तीस लाख नव्वद हजार एकशे शहात्तर फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, ४० लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेच्या बोरगाव (ता. कवठेमहंकाळ, जि.सांगली) नळ पाणी पुरवठा योजनेच्या रू. ३,२०२/- इतका दरडोई खर्च

असलेल्या रू. १,३२,९०,१७६/- (रूपये एक कोटी बत्तीस लाख नव्वद हजार एकशे शहात्तर फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास शासन प्रशासकीय मान्यता देत आहे.

२. संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी लोकवर्गणी पुर्णत: रद्द करण्यात आली आहे.

३. ४० लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेच्या बोरगाव नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास खालील अटींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

i) सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी संदर्भ क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या मार्गदर्शक सुचनांचा अवलंब करण्यात यावा.

ii) योजनेची कामे विहीत पध्दतीने निविदा मागविण्यात येऊन करावीत. जादा किंमतीच्या निविदा स्विकृत करण्यापूर्वी तसेच मंजूर दरापेक्षा जास्त दराने साहित्य (उदा. पाईप्स) घेण्यापूर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी

iii) योजनेचे स्त्रोत बळकटीकरण करण्यात यावे. योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळजोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

iv) योजनेची कामे मंजूर किंमतीत कालबध्द व नियोजनबध्दरित्या पूर्ण करण्यात यावीत.

v) योजनेतील कामे टप्प्या- टप्प्याने करावीत. उद्भव विकसित झाल्याशिवाय इतर कामे करू नयेत. (उद्भवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत)

vi) ग्रामपंचायत बोरगाव यांनी किमान रू.७००/- इतकी वार्षिक पाणीपट्टी निश्चित करून योजना चालविण्याकरिता व देखभाल दुरूस्तीसाठी येणारा खर्च भागवावा. त्यासाठी शासनाकडून अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

vii)संदर्भ क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये देखभाल, दुरूस्ती व त्रयस्थ यंत्रणा तपासणीबाबत देण्यात आलेल्या सुचनांचा अवलंब करण्यात यावा.

viii) प्रचलित धोरणानुसार हागणदारीमुक्तीचे अभियान राबविण्यात यावे.

ix) कोणत्याही कारणाने खर्चात वाढ झाल्यास शासनाकडून अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

x) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची पुर्तता करण्यात यावी व राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसंदर्भात शासनाने विहीत केलेल्या मार्गदर्शक सुचनांचा अवलंब करण्यात यावा.

Xi) योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी निश्चित करणे व त्यात आवश्यकतेनुसार वाढ करणे ग्रामपंचायतीस बंधनकारक राहील, याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिकाऱ्यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना स्पष्टपणे सविस्तर माहिती द्यावी व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरूवात करावी.

४. सदर योजनेवर होणारा खर्च हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत जिल्हा परिषदेला प्राप्त होणाऱ्या केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा. राज्य हिस्स्याची (५०%) तरतूद जिल्हा योजनेतून उपलब्ध करून देण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सांगली यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२४१२४९४६३५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHANKAR SURENDRA PRALHAD

Digitally signed by CHANKAR SURENDRA PRALHAD
DN: c=IN, o=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, ou=WATER SUPPLY AND SANITATION,CID - 917820, postalCode=400032, st=Maharashtra, cn=CHANKAR SURENDRA PRALHAD
Date: 2015.03.27 15:01:42 +05'30'

**(सु. प्र. चानकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) सर्व मा. विधानसभा/ विधानपरिषद सदस्य.
३) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१.
५) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
६) जिल्हाधिकारी, सांगली.
७) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली.
९) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
१०) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
११) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पा.पु.व स्व.वि., यांचे स्वीय सहा. मंत्रालय, मुंबई.
१२) मुख्य अभियंता (ना व ग्रा ), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे.
१३) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
१४) अधीक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, समन्वय व सनियंत्रण कक्ष, पुणे.
१५) अधीक्षक अभियंता, म.जी.प्रा. (ना. व ग्रा.) योजना मंडळ, सांगली.
१६) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, सांगली.
१७) जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सांगली.
१८) कार्यासन क्र. पापु-०४,०५,०६,०९,१०,१३ व १८, पा. पु. व स्व. विभाग,मंत्रालय, मुंबई
१९) निवड नस्ती पापु-१७